**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन- २०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २८ जुलै, २०२०

**वाचा :**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-वाहन-१०११/प्र.क्र.५८/११/विनियम, दि. २७.३.२०१२.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-१०१४ /प्र.क्र.९/१४/विनियम, दि.८.५.२०१४
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-१०१४ /प्र.क्र.९/१४/विनियम, दि.४.८.२०१४
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-१०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दि.७.८.२०१४
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-२०१६ /प्र.क्र.५१/१६/विनियम, दि.२१.०१.२०१७
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वाहन-२०१६ /प्र.क्र.५१/१६/विनियम, दि.७.९.२०१८

**प्रस्तावना :**

शासनाचे विविध पदाधिकारी / अधिकारी यांना त्यांच्या दर्जानुसार शासकीय वाहन खरेदीकरीता असलेली किंमत मर्यादा ठरविण्याबाबतचे सर्व आदेश एकत्रित करून संदर्भाधीन अ.क्र.५ येथील दि.२१.१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये एकसंध आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या शासन निर्णयामधील अ.क्र. १ ते १५ येथे नमूद निश्चित करण्यात आलेली वाहन किंमत मर्यादा ही सन २०१४ मध्ये निश्चित केली असून त्यास पाच वर्षाचा कालावधी उलटून गेला आहे. तर अ.क्र. १६ येथे नमूद ₹ ६.०० लक्ष ही किंमत मर्यादा मार्च-२०१२ पासून लागू असल्याने त्यासही सात वर्षाचा कालावधी होऊन गेला आहे. दरम्यानच्या कालावधीत वाहनांच्या किंमतीत झालेली वाढ विचारात घेता संदर्भिय शा. नि. दि. २१.१.२०१७ मधील तक्त्यातील अ.क्र. १४ ते १७ येथे नमूद अधिकारी यांना अनुज्ञेय किंमत मर्यादेत वाहन खरेदी करणे शक्य होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच या शासन निर्णयात काही पदाधिकारी / अधिकारी यांचा समावेश नसल्याने त्यांच्याकरीता किती किंमत मर्यादेतील वाहन खरेदी करावे याबाबत संभ्रम निर्माण होत आहे. सबब यात सुस्पष्टता येणेकरिता संदर्भिय शासन निर्णय दिनांक २१.१.२०१७ मध्ये काही सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. यासंदर्भात सांगोपांग विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

नवीन शासकीय वाहन खरेदी किंवा निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदी करताना विविध पदाधिकारी/शासकीय अधिकारी यांच्याकरीता खालील किंमत मर्यादेतील वाहन त्यांच्या दर्जानुसार शासकीय वाहन म्हणून अनुज्ञेय राहील.

| अ.क्र. | पदाधिकारी/अधिकारी यांची पदनामे | वाहनांचा प्रकार | किंमत मर्यादा |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | मा.राज्यपाल | त्यांच्या पसंतीनुसार | मर्यादा नाही |
| २. | मा.मुख्यमंत्री | ----"---- | ----"---- |
| ३. | मा.उपमुख्यमंत्री | ----"---- | ----"---- |
| ४. | मा.मुख्य न्यायमुर्ती, उच्च न्यायालय / मा.लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य | ----"---- | ----"---- |
| ५. | राज्यातील जिल्ह्यांमध्ये दौऱ्यावर येणारे मंत्रीमंडळातील मा.सदस्य तसेच राज्य अतिथी यांच्या परिवहन व्यवस्थेसाठी. | संबंधित जिल्हाधिकारी व जिल्ह्याचे पालकमंत्री यांच्या पसंतीनुसार तथापि, स्तंभ -४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे विनिर्दिष्ट किंमत मर्यादेत. | ₹ २०.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ २०.०० लक्षच्या मर्यादेत) |
| ६. | मा.कॅबिनेट मंत्री | त्यांच्या पसंतीनुसार तथापि स्तंभ-४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे विनिर्दिष्ट किंमत मर्यादेत. | ----"---- |
| ७. | मा.उच्च न्यायालयाचे न्यायाधीश, मा.उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य | ----"---- | ----"---- |
| ८. | मा.राज्यमंत्री | ----"---- | ----"---- |
| ९. | मा.मुख्य सचिव | ----"---- | ₹ १५.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ १५.०० लक्षच्या मर्यादेत) |
| १०. | मा.महाधिवक्ता | ----"---- | ----"---- |
| ११. | मुख्य माहिती आयुक्त/ राज्य निवडणूक आयुक्त | ----"---- | ----"---- |

| | | | |
|---|---|---|---|
| | / राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त/ अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग | | |
| १२. | मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (मंत्रालयीन विभाग) | ----"---- | ₹ १२.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ १२.०० लक्षच्या मर्यादेत) |
| १३. | राज्य माहिती आयुक्त/ सदस्य, महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ राज्य सेवा हक्क आयुक्त | ----"---- | ----"---- |
| १४. | राज्यातील सर्व विभागांचे राज्य स्तरीय विभागप्रमुख/ विभागीय आयुक्त / परिक्षेत्राचे पोलीस महानिरिक्षक /प्रधान मुख्य वन संरक्षक (समकक्ष अधिकारी अंतर्भूत नाहीत.) | ----"---- | ₹ १०.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ १०.०० लक्षच्या मर्यादेत) |
| १५. | जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी/ जिल्हा पोलीस अधिक्षक व त्यावरील पोलीस संवर्गातील अधिकारी (समकक्ष अधिकारी अंतर्भूत नाहीत.) | ----"---- | ₹ ९.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ ९.०० लक्षच्या मर्यादेत) |
| १६. | महाप्रबंधक/ प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई | ----"---- | ₹ ९.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ ९.०० लक्षच्या मर्यादेत) |

| | | | |
|---|---|---|---|
| १७. | अ)मा.राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय आ)राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहन अनुज्ञेय केलेले इतर अधिकारी | ----"---- | ₹ ८.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन एकूण ₹ ८.०० लक्षच्या मर्यादेत) |

२. अनुज्ञेय वाहन खरेदी करताना आपल्या कार्यक्षेत्रात सदर वाहनाच्या देखभाल व दुरुस्तीची सुविधा तसेच वाहनाच्या सुटया भागांची (Spare Parts) उपलब्धता समाधानकारक असल्याची खातरजमा करावी. तसेच उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.१ ते ४ येथील पदाधिकारी / अधिकारी वगळता उर्वरीत पदाधिकारी / अधिकारी यांच्या वाहनांची खरेदी Gem Portal वरून करणे अनिवार्य राहील.

३. वाहन विषयक शासन निर्णय, क्रमांक- वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.०९.२००१ नुसार वाहनांची अनुज्ञेयता राज्य स्तरीय वाहन आढावा समिती निश्चित करेल. वाहन आढाव्याअंती मंजूर झालेल्या वाहनांपैकी, सर्व विहित अटींची पूर्तता करुन निर्लेखित झालेल्या वाहनांच्या बदल्यात नवीन वाहन खरेदीचे प्रस्ताव अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने मंजूर करण्यात येतील. वाहन आढाव्यामध्ये वाहने अनुज्ञेय नसल्यास बदली वाहन / नवीन वाहनांच्या खरेदीची मागणी करण्यात येऊ नये. वाहन आढावा झालेला नसेल तेव्हा नवीन वाहन खरेदी/अनुज्ञेय करताना राज्य स्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे राज्यस्तरीय वाहन आढावा समितीसमोर वाहन आढावा अथवा वाहन खरेदीचे प्रस्ताव पाठविण्यापूर्वी संबंधित विभागाची/कार्यालयातील वाहनांची माहिती शासनाच्या https://mahavahan.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर भरण्यात आलेली असावी; अन्यथा खरेदी अथवा आढाव्याच्या प्रस्तावांवर समितीकडून विचार करण्यात येणार नाही.

४. संबंधित पदाधिकारी / अधिकारी यांच्या वापरातील जुने वाहन, नियमांमधील निकषानुसार निर्लेखित झाल्यानंतरच या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या किंमत मर्यादेत उपरोक्त परि.३ येथे नमूद केल्यानुसार योग्य स्तरावर मान्यता घेऊन वाहन खरेदी करता येईल. वापरातील वाहन -निर्लेखन योग्य॰ नसल्यास कोणत्याही परिस्थितीत "विशेष बाब" म्हणून नवीन वाहन खरेदीस मान्यता देण्यात येणार नाही. तसेच यापूर्वीच्या अनुज्ञेय किंमत मर्यादेनुसार वाहन खरेदीस मान्यता दिलेली असताना केवळ किंमत मर्यादेत सुधारणा झाल्यामुळे वाहन खरेदीचे प्रस्ताव सादर केल्यास अशा प्रस्तावांनाही मान्यता देण्यात येणार नाही.

५. वरील शासन निर्णयान्वये केलेल्या तरतूदी स्वायत्त संस्था/ सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम/ मंडळे/ महामंडळे यांना लागू राहतील. हे आदेश सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या

नियंत्रणाखालील सर्व स्वायत्त संस्था / सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम/ मंडळे/ महामंडळे यांच्या निर्देशनास तात्काळ आणावेत व त्याची प्रत वित्त विभागास पृष्ठांकित करावी.

६. यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले वाहनांच्या किंमत मर्यादेबाबतचे आदेश निष्प्रभावित करुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. या शासन निर्णयाची अंमलबजावणी या आदेशाच्या दिनांकापासून करण्यात येईल.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२८१६५००२२००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793
b66f7249aaa9c1a, postalCode=400032,
street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI,
serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652
b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI
GORE
Date: 2020.07.28 16:56:27 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२. सर्व सन्माननीय विधान परिषद /विधानसभा व संसद सदस्य,
३. मा. राज्यपाल यांचे सचिव,
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
६. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
८. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा / अपील शाखा) मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई,
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१४. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
१५. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८. मुख्य माहिती आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१९. महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई,
२०. प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, पुणे /नागपूर/औरंगाबाद/अकोला/अमरावती/ठाणे/नाशिक/ सोलापूर / मुंबई,
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२२. सर्व विभागीय आयुक्त,
२३. सर्व जिल्हाधिकारी,
२४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२६. सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे /नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
२८. संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकणभवन, नवी मुंबई,
२९. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण/पुणे /नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
३०. सर्व कोषागार अधिकारी,
३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
३२. निवड नस्ती ( विनियम), वित्त विभाग.

**************